आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ वर्षात महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनीस अनुदान या योजनेंतर्गत वीज उपकेंद्रांच्या उभारणीकरिता निधी वितरण. (लेखाशिर्ष-२८०१ ५०८९)

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२३ /प्र.क्र.१८६ /ऊर्जा-५

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २९ मार्च, २०२३

वाचा :-

१. शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-२०१९ /प्र.क्र.१२६(१) /ऊर्जा-५, दि. १६ नोव्हेंबर, २०१९.
२. शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-२०१९ /प्र.क्र.१२६(२) /ऊर्जा-५, दि. १९ सप्टेंबर, २०१९.
३. शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-२०२३ /प्र.क्र.१२४ /ऊर्जा-५, दि. २१ फेब्रुवारी, २०२३.
४. शासन निर्णय क्रमांक: बीयुडी-२०२२/प्र.क्र. ०५/कार्यासन-६, दि.२५ मार्च, २०२३.

**प्रस्तावना:-**

आदिवासी उपयोजनेअंतर्गत गडचिरोली, अहमदनगर, यवतमाळ व नंदुरबार जिल्ह्यात प्रस्तावित एकूण ९ वीज उपकेंद्रांकरिता एकूण रु.७७.५१ कोटी इतक्या प्रकल्प रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या ९ उपकेंद्रांपैकी कोटगुल, पेरमिली, रेगुंठा, अहेरी, देवधरी व तोरणमाळ ही वीज उपकेंद्रे उभारण्याकरिता लागणारी जागा महावितरण कंपनीच्या ताब्यात असून कोटगुल उपकेंद्राकरिता ३३ के.व्ही. व ११ के.व्ही. वीज वाहिनीचे काम प्रगतीपथावर आहे.

सन २०२३ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात आदिवासी उपयोजनेअंतर्गत लेखाशिर्ष २८०१५०८९ अंतर्गत सुधारित तरतूद रू. ३५ कोटी अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. उपरोक्त एकूण ९ मंजुर उपकेंद्रापैकी ६ उपकेंद्राच्या जागा महावितरणच्या ताब्यात असून यांची प्रकल्प किंमत एकूण रू. ५६ कोटी इतकी आहे.

संदर्भिय शासन निर्णय क्र.(४) अन्वये लेखाशिर्ष २८०१ ५०८९ अंतर्गत रु.३५ कोटी आदिवासी विकास विभागाने प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (ऊर्जा) यांना वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आले आहेत. त्याअनुषंगाने सदर निधी रु.३५,००,००,०००/- (रु.पस्तीस कोटी फक्त) महावितरण कंपनीस प्रकल्पनिहाय वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना आदिवासी विकास विभागाच्या आदिवासी घटक कार्यक्रमाअंतर्गत सन २०२२-२३ वर्षात महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनीस अनुदान या योजनेअंतर्गत वीज उपकेंद्रांच्या उभारणीकरिता सोबतच्या विवरणपत्र-अ नुसार प्रकल्पनिहाय एकूण

रु.३५,००,००,०००/- (रु.पस्तीस कोटी फक्त) महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. महावितरण कंपनीला निधी वितरण करताना, प्रकल्पाच्या प्रगती व साध्यास बाधा न पोहोचता निधी उपलब्ध होऊन प्रकल्प विहित वेळेत पूर्ण होण्याच्या दृष्टीने वितरण नियोजित करण्यात आले आहे.

२. या निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम कोटगुल, पेरमिली, रेगुंठा, अहेरी, देवधरी व तोरणमाळ ही वीज उपकेंद्रे उभारण्याकरिता खर्च होईल याची दक्षता विभाग स्तरावर ऊर्जा-५ विभागाने तसेच महावितरण कंपनीने घ्यावी. ज्या उद्देशासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्देशासाठी तो उपयोगात आणला जाईल याची जबाबदारी महावितरण कंपनीची राहील. अशा आदिवासी विभागाच्या सूचना आहेत. त्यानुसार मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत विहित वेळेत प्रकल्प पूर्ण करण्यात येऊन, संचालक (वित्त), महावितरण यांच्या मान्यतेने तसे उपयोगिता प्रमाणपत्र द्यावे. प्रकल्पांच्या भौतिक व आर्थिक प्रगतीचा अहवाल दर तीन महिन्यास सादर करावा. सदर प्रकल्प वेळेवर पूर्ण करण्याची जबाबदारी महावितरण कंपीनीची राहील. त्यांनी याकरिता जबाबदार अधिकाऱ्यास नामनिर्देशित करावे.

३. वरील बाबींचा खर्च मागणी क्र.टी-५, २८०१, वीज उपमुख्य लेखाशिर्ष-८० सर्वसाधारण, गौणशिर्ष-७९६ जनजाती क्षेत्र योजना, गटशिर्ष-(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना उप गट शिर्ष योजना (०१) (०३) महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनीस अनुदान योजना सांकेतांक (२८०१ ५०८९) (राज्यस्तरीय योजना) (कार्यक्रम) ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ करिता मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदरची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.ना.रा.ढाणे, अवर सचिव (ऊर्जा-३) व श्री.ना.श्री.कराड, नियंत्रण अधिकारी म्हणून उप सचिव (ऊर्जा-३) , उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर मंजूर झालेली रक्कम रु.३५,००,००,०००/-(रु.पस्तीस कोटी फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरित करण्याची कार्यवाही करावी.

५. या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. वित्त विभागाच्या क्र. अर्थस-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक १६ मार्च, २०२३ च्या परिपत्रकातील सर्व अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाचा अनौ. संदर्भ क्र.११२/का-६, दि.२५.०३.२०२३ अन्वये आदिवासी विकास विभागाने मान्यता दिल्यानुसार व संदर्भिय शासन निर्णय क्र.(४) अन्वये मान्यता दिल्यानुसार प्रशासकीय विभागाच्या अधिकारात सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

७.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०३२९१२११०९२७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT PUNDLIK BADGERI

Digitally signed by PRASHANT PUNDLIK BADGERI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, pseudonym=AC7259A119539CB47009F7E30F693EAB895718AB, serialNumber=EC955E2D360E1FDDB6ABAC58A907419053BEECEB5DBAC48A78C89C588FF71BEF, cn=PRASHANT PUNDLIK BADGERI
Date: 2023.04.10 15:59:04 +05'30'

**(प्र. पुं. बडगेरी)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (ऊर्जा) यांचे प्रधान सचिव
४. मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, विधानभवन, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
१०. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नंदुरबार.
११. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली.
१२. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, यवतमाळ.
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
१४. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
१५. कोषागार अधिकारी, जिल्हा नंदुरबार.
१६. कोषागार अधिकारी, जिल्हा गडचिरोली.

१७. कोषागार अधिकारी, जिल्हा यवतमाळ.

१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

२०. अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१. कक्ष अधिकारी (व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२२. कार्यासन अधिकारी (का-३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

२३. निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

२४. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.

शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२३ /प्र.क्र.१८६ /ऊर्जा-५, दि.२९.०३.२०२३ चे सहपत्र

**विवरणपत्र "अ"**

**आदिवासीबहुल क्षेत्रात उपकेंद्र उभारणीच्या प्रकल्पांना वितरित करण्यात आलेल्या निधीचा तपशील**

**(रु.कोटी)**

| **अ.क्र.** | **जिल्हा** | **तालुका** | **उपकेंद्राचे नाव** | **प्रशासकीय मान्यता** | **वितरित निधी** |
|---|---|---|---|---|---|
| १ | गडचिरोली | कोर्ची | कोटगुल (ढोलडोंगरी) | १०.६१ | ४.६१ |
| २ | नंदुरबार | अक्राणी | तोरणमाळ | १०.९१ | ९.८१९ |
| ३ | गडचिरोली | सिरोंचा | रेगुंठा | ८.६३ | ७.७६७ |
| ४ | यवतमाळ | राळेगांव | देवधरी | ७.६१ | ६.८४९ |
| ५ | गडचिरोली | अहेरी | अहेरी | ४.८ | ४.३२ |
| ६ | गडचिरोली | भामरागड | पेरमिल्ली | १९.३९ | १.६३५ |
| **एकूण** | | | | **६१.९५** | **३५.००** |